**नक्षलग्रस्त आदिवासी उपयोजना बाहय क्षेत्रातील गावांमध्ये नक्षलवादयांना गावबंदी योजनेंतर्गत प्रोत्साहन अनुदान मंजूर करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**नियोजन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: नक्षल २४१६/प्र.क्र.७६/का.१४१७**

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक: १६ मार्च, २०१७.

वाचा: **१. गृह विभाग शासन निर्णय क्र. एनएएक्स-११०९/प्र.क्र.६२९/विशा-१ब, दि. १८ मार्च, २०११.**
**२. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. २० एप्रिल, २०१६.**

**प्रस्तावना:**

नक्षल चळवळीस आळा घालण्याच्या दृष्टीने बिगर आदिवासी क्षेत्रातील गावांमध्ये नक्षलवाद्यांना गावबंदी योजना लागू करण्याचा निर्णय संदर्भाधीन शासन निर्णय क्र. १ अन्वये घेण्यात आला आहे. त्यानुसार नक्षलग्रस्त आदिवासी उपयोजना बाहय क्षेत्रातील ज्या गावांनी पुढाकार घेऊन नक्षलवाद्यांना गावबंदी केली आहे, अशा गावांना प्रत्येकी रु. ३.०० लक्ष इतका निधी त्या गावांच्या विकास कामांसाठी प्रोत्साहनात्मक अनुदान म्हणून मंजूर करण्यात येतो. याबाबत विभागीय आयुक्त, नागपूर यांचेमार्फत जिल्हाधिकारी, गडचिरोली व गोंदिया यांचा बिगर आदिवासी क्षेत्रातील अनुक्रमे १० व ४ अशा एकूण १४ गावांसाठी रु. ४२.०० लक्ष निधी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी मंजूर करण्याबाबतचा प्रस्ताव प्राप्त झाला असून या संदर्भात निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

गडचिरोली जिल्हयातील तहसिल मुलेचेरा येथील आदिवासी उपयोजना बाहय क्षेत्रातील तरुणनगर, श्रीनगर, भगतनगर, भवानीपूर अंतर्गत सुंदरनगर ग्रामपंचायत, गिताली, शांतीग्राम, कांचनपूर अंतर्गत शांतीग्राम ग्रामपंचायत, जामगांव, टिकेपल्ली व काकरगट्टा अंतर्गत चुटुगट्टा ग्रामपंचायत या १० गावांकरिता व गोंदिया जिल्हयातील तहसिल सालेकसा येथील आदिवासी उपयोजना बाहय क्षेत्रातील खेडेपार, कहाली, बिंझली व धानोली या ४ गावांकरिता अशा एकूण १४ गावांकरिता प्रत्येकी ३.०० लक्ष याप्रमाणे एकूण रुपये ४२.०० लक्ष ( रु. बेचाळीस लक्ष फक्त ) एवढा निधी या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. सदरहू निधी खर्च करताना संदर्भाधीन शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांचे तसेच वित्त विभागाने शासन परिपत्रकामध्ये दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. या अनुषंगाने होणारा खर्च "मागणी क्र. ओ-७, ३४५१ सचिवालय आर्थिक सेवा, ०९० सचिवालय, (०४) नक्षलग्रस्त भागासाठी विशेष कृती दल , (०४)(०१) नक्षलग्रस्त भागासाठी विशेष कृती दल, ३१

सहाय्यक अनुदाने (योजनांतर्गत )(वेतनेत्तर) संगणक संकेतांक (३४५१०६५४)" या लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर निधी संबंधित जिल्हाधिकारी यांना अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे उपलब्ध करुन देण्यात येत आहे. सदरहू निधी त्यांनी संबंधित ग्रामपंचायतीस एकाच हप्त्यात अदा करण्यासाठी संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना मंजूर करावा.

५. या निधीच्या खर्चाचा ताळमेळ ठेवण्याची तसेच खर्चाची माहिती वेळोवेळी शासनास देण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील. या योजनेकरिता मंजूर करण्यात येणारा निधी विहीत मुदतीत संपूर्णतः खर्च होईल याची दक्षता संबंधितांनी घ्यावी.

६. राज्य निवडणूक आयोगाचे वेळोवेळी निवडणूकी संदर्भातील आचारसंहितेचे निर्गमित होणारे आदेश विचारात घेऊन योग्य ती कार्यवाही करण्याची दक्षता घ्यावी.

७. हा शासन निर्णय वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. २० एप्रिल,२०१६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन व गृह विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. १४/विशा-१ब, दि. ०९/०३/२०१७ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३१६१११९०६०७१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Narendra Vaman Aher

Digitally signed by Narendra Vaman Aher
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Narendra Vaman Aher
Date: 2017.03.16 11:20:27 +05'30'

**( नरेंद्र वा. आहेर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
३. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
४. सह सचिव (वि.शा.), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
५. जिल्हाधिकारी, गडचिरोली/गोंदिया.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, गडचिरोली/गोंदिया.
७. जिल्हा पोलिस अधिक्षक, गडचिरोली/गोंदिया.
८. सहसंचालक, लेखा व कोषागारे संगणक कक्ष, ५ वा मजला, न. प्र. भवन, मंत्रालयासमोर, मुंबई-३२.

९. निवासी लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई.
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११. जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर.
१२. विशेष कार्य अधिकारी (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर.
१३. उपवन संरक्षक, गडचिरोली/गोंदिया.
१४. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, गडचिरोली/गोंदिया.
१५. प्रकल्प अधिकारी , एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, गडचिरोली/गोंदिया.
१६. वित्त विभाग/व्यय-८, अर्थ-१६, साधनसंपत्ती, अर्थोपाय, मंत्रालय, मुंबई- ३२.
१७. कार्यासन अधिकारी (का. १४११/१४१४/१४२४), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
१८. निवड नस्ती का. १४१७.